राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजा मेंढा, ता. व जि. गडचिरोली या वाढीव दरडोई खर्च असलेल्या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१६१४/प्र.क्र.३२५/पापु-१३

## मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

## तारीखः १६ एप्रिल, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक ९.१०.२०१३.

२) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४

३) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४४

४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो १११४/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक १७.१०.२०१४

५) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या निविदा स्विकृतीच्या अधिकाराबाबत शासन परिपत्रक क्रमांकः ग्रापाधो १११४/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक १७.१०.२०१४

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गडचिरोली यांचे पत्र क्र./जिपग/ ग्रापापु/तांशा-३/ २३६३/२०१४,दि.०९/१०/२०१४

**प्रस्तावना**

मौजा मेंढा ता. व जि. गडचिरोली या नळ पाणी पुरवठा योजनेच्या प्रस्तावास अधीक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, नागपूर विभाग, नागपूर यांनी दि.२२/०५/२०१४ रोजी तांत्रीक मान्यता दिली आहे. प्रस्तुत नळ पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा जिल्हा परिषदेच्या विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव गडचिरोली जिल्हा परिषदेने शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यामुळे वाढीव दरडोई खर्च असलेल्या मौजा मेंढा ता. व जि. गडचिरोली या नळ पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

## शासन निर्णय

मौजा मेंढा ता. व जि. गडचिरोली या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.४६४३/- एवढया दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. ९१,४६,०३५ /- (अक्षरी रुपये एक्याण्णव लक्ष सेहेचाळीस हजार पस्तीस फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयाद्वारा ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

**३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. सदर योजनेची अंमलबजावणी ग्रामपंचायत/ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री ग्रामपंचायतीने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती / संदर्भाधिन अनु.क्र.४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावी.

२. योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी किमान **रु.१२००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणीपट्टी निश्चित करावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, गडचिरोली यांनी स्वत: करावी. तसेच प्रकल्पित वर्षात पाणीपट्टी दरात वाढ करण्याऐवजी योजनेचा वार्षिक भार हा प्रकल्पित वर्षासाठी प्रस्तावित असलेल्या पाणीपट्टी द्वार भागेल एवढया पर्यत कमी करण्यात यावा.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४. योजनेचे स्रोत बळकटीकरण करण्यात यावे. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

५. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

६. गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

७. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

८. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.(उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.)

९. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नये.

१०. अस्तित्वातील स्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

११. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१२. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र.२ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

१३. देखभाल दुरुस्ती खर्चात कपात करुन पाणी पट्टी वाढ मर्यादित करण्यात यावी.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा. राज्य हिश्याची तरतूद राज्य स्तर तसेच जिल्हा परिषद गडचिरोली यांनी त्यांना जिल्हा नियोजन समितीमार्फत उपलब्ध होणा-या निधीमधून करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१६१०५०१८१७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Deoram Ambekar

Digitally signed by Suresh Deoram Ambekar
DN: CN = Suresh Deoram Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.04.16 11:48:39 +05'30'

**सु.दे.आंबेकर**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
३. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
४. विभागीय आयुक्त,अमरावती विभाग,नागपूर.
५. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
६. जिल्हाधिकारी, गडचिरोली.
७. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, गडचिरोली.
९. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१०.मुख्य अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा.योजना,ठाणे.
११.जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,गडचिरोली.
१२.अधिक्षक अभियंता,भारत निर्माण कक्ष,विभागीय आयुक्त कार्यालय,नागपूर.

१३.अधिक्षक अभियंता,मजीप्रा,ना.व ग्रा. योजना मंडळ,गडचिरोली.
१४.कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, गडचिरोली.
१५.महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१६.महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
१८.मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१९.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. १,४,५,६,९,१७ व १८.
२०.निवडनस्ती पापु-१३,पा.पु.व स्व.वि.मंत्रालय,मुंबई.